विद्यार्थ्यांना मोफत गणवेश योजनेचा लाभ तसेच बुट व पायमोजे उपलब्ध करवून देण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः समग्र-२०२३/प्र.क्र.१९२/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ११ जुलै, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्र.एसएसए-२०१६/प्र.क्र.१११/एस.डी.-३/ दि.२१.०७.२०१६ .
२) केंद्र शासनाच्या समग्र शिक्षा कार्यक्रमांतर्गत मार्गदर्शक सूचना दि.१६.०८.२०२१.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्र.एसएसए-१२१४/प्र.क्र.५०/एस.डी.-३/ दि.०६.०७.२०२३.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या समग्र शिक्षा कार्यक्रमांतर्गत मोफत गणवेश योजनामधून शासकीय तसेच, स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमधील इ.१ ली ते ८ वीच्या वर्गातील सर्व मुली, अनुसूचित जाती व जमातींची सर्व मुले आणि दारिद्र्य रेषेखालील पालकांची मुले यांना मोफत गणवेशाचा लाभ देण्यात येतो. सद्य:स्थितीत उपरोक्त शाळांमधील फक्त दारिद्र्य रेषेवरील पालकांच्या मुलांना मोफत गणवेश योजनेचा लाभ मिळत नाही. सदर विद्यार्थ्यांनादेखील मोफत गणवेश योजनेचा लाभ देण्याचा तसेच, मोफत गणवेश योजनेंतर्गत सर्व पात्र विद्यार्थ्यांना एक जोडी बुट व दोन जोडी पायमोजे देण्याचा निर्णय शासनाने संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर बाबींकरीता एकुण रू. १५८.५२ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासकीय तसेच, स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमध्ये इयत्ता १ ली ते इयत्ता ८ वी च्या वर्गातील सर्व मुली, अनुसूचित जाती व जमातींची सर्व मुले आणि दारिद्र्य रेषेखालील पालकांची सर्व मुले यांच्याबरोबरच योजनेपासून वंचित राहणाऱ्या इतर प्रवर्गातील दारिद्ररेषेवरील पालकांच्या मुलांकरीता दरवर्षी दोन मोफत गणवेश उपलब्ध करुन देण्या करीता रू. ७५.६० कोटी व शासकीय तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमधील इ.१ ली ते ८ वी तील सर्व विद्यार्थ्यांना दरवर्षी एक जोडी बुट व दोन जोडी पायमोजे उपलब्ध करवून देण्याकरीता रू. ८२.९२ कोटी असा एकुण रू.१५८.५२ कोटी इतका निधी समग्र शिक्षा अभियानांतर्गत सर्वसाधारण राज्य हिस्स्याच्या रक्कमेमधून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. मोफत गणवेश आणि एक जोडी बुट व दोन जोडी पायमोजे या योजनेची अंमलबजावणी शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४ पासून करण्यात येईल.

३. सदर खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६- शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२०२ आय ६१२)" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करून वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख शाखा/ लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तर सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करून निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक १२.०४.२०२३ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरिताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. २३८/१४७१, दि.३०.०६.२०२३ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ६८६/ व्यय-५, दि. ०७.०७.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१२१७२७५३७०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

IMTIYAZ MUSHTAQUE KAZI

Digitally signed by IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=39a40419de755c2eab61fb555b2fdf8c8d6d652ff18fdffbd9c748ab01f6da04, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=77A529748C5E7C1BA7A66E81C654BA3C492FDA5B29E076241DB1BA213DDEDF4E, cn=IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
Date: 2023.07.13 14:45:40 +05'30'

**( इ. मु. काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१८) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१९) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती - एस.डी. ३.